**मालेगाव उर्दू घरासाठी नियुक्त कर्मचाऱ्यांचे मानधन, देखभाल दुरुस्ती व परिचालन, इत्यादीसाठी वर्ष २०२४-२५ या आर्थिक वर्षात निधी वितरित करणेबाबत...**

**महाराष्ट्र शासन**
**अल्पसंख्याक विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः माउघ २०२२/प्र.क्र.६१/का.४**
मादाम कामा रोड, हुतात्मा चौक,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
तारीख: २७.०२.२०२५.

**वाचा -**

१) शासन निर्णय, अल्पसंख्या विकास विभाग, क्रमांक उघव्य-२०१६/प्र.क्र.१९/कार्या-४, दि.२१ जुलै, २०१६.
२) शासन परिपत्रक, वित्त विभाग क्रमांक अर्थसं-२०२४/प्र.क्र.३४/अर्थ-३, दि.०१.०४.२०२४
३) शासन परिपत्रक, वित्त विभाग क्रमांक अर्थसं-२०२४/प्र.क्र.८०/अर्थ-३, दि.२५.०७.२०२४
४) जिल्हाधिकारी, नाशिक यांचे पत्र क्रमांक साशा/कक्ष ६/२/OLNSK-१७०१३/४०/२०२४, दि.२२.१०.२०२४.

**प्रस्तावना -**

शासन निर्णय, दि.२१ जुलै, २०१६ अन्वये महाराष्ट्र राज्यातील उर्दू घरांचा वापर, देखभाल दुरुस्ती तसेच उर्दू घरे सुस्थितीत ठेवण्यासदंर्भात नियामावली विहित करण्यात आली आहे. सदर शासन निर्णयानुसार उर्दू घरांचे नियंत्रण व व्यवस्थापन संबंधित जिल्हाधिकारी किंवा त्यांनी प्राधिकृत केलेले, उप-जिल्हाधिकारी पेक्षा कमी नाही अशा दर्जाचे अधिकारी, यांचे मार्फत करण्यात येणार आहे. त्यास अनुसरुन जिल्हाधिकारी, नाशिक यांनी त्यांच्या संदर्भ क्र.४ येथील पत्रान्वये, अनुदान वितरित करण्यासाठी मागणी सादर केली आहे. त्यामुळे मालेगाव उर्दू घरासाठी बाहययंत्रणेने नियुक्त केलेले कर्मचारी यांचे मानधन, उर्दू घराची देखभाल दुरुस्ती, परिचालन व इतर खर्चसाठी अनुदान वितरित करण्याची बाब शासनाच्या विचाराधिन होती.

## शासन निर्णय -

जिल्हाधिकारी, नाशिक यांनी संदर्भ क्र.४ येथील पत्रान्वये मागणी केल्यानुसार मालेगाव उर्दू घरासाठी बाहययंत्रणेने घेतलेल्या कर्मचाऱ्यांचे मानधन, उर्दू घराची देखभाल दुरुस्ती, परिचालन व इत्यादी बाबींसाठी खालीलप्रमाणे रु.२९,३५,१४४/- (रुपये एकोणतीस लाख पस्तीस हजार एकशे चौव्वेचाळीस मात्र) इतके अनुदान जिल्हाधिकारी, नाशिक यांना वितरित करण्यास याद्वारे मान्यता देण्यात येत आहे.

| अ.क्र. | प्रयोजन | रक्कम |
|---|---|---|
| १ | व्यवस्थापक, ग्रंथपाल, लिपिक टंकलेखक यांचे मासिक मानधन | रु.९,००,०००/- |
| २ | एस डी.एन.एन्टरप्रायईजेस या बाहययंत्रणेतील एकूण ८ कामगारांकरिता | रु.१८,९०,१४४/- |
| ३ | वीज देयक | रु.१,००,०००/- |
| ४ | पाणीपट्टी देयक | रू.५,०००/- |
| ५ | उर्दू घराचा कार्यालयीन खर्च | रु.४०,०००/-<br>जनरेटरसाठी इंधन — रु.२०,०००/-<br>सांस्कृतिक समितीच्या बैठकीकरिता सदस्यांना मानधन व प्रवास खर्च — रु.२०,०००/- |
| | **एकूण** | **रु. २९,३५,१४४/-** |

२. संदर्भ क्र.२ येथील शासन निर्णयासोबतच्या परिशिष्टामधील अ.क्र.(९) येथील अटींची पूर्तता करण्याच्या आधीन राहून जिल्हाधिकारी, नाशिक यांना सन २०२४-२५ या आर्थिक वर्षात वरीलप्रमाणे मंजूर करण्यात आलेली रु.२९,३५,१४४/- (रुपये एकोणतीस लाख पस्तीस हजार एकशे चौव्वेचाळीस मात्र) इतकी रक्कम अर्थसंकल्पीय प्रणालीमधून आहरण व संवितरण करण्यास या शासन निर्णयान्वये मंजूरी देण्यात येत आहे. त्यांनी सदर निधीच्या विनियोगाबाबचे उपयोगिता प्रमाणपत्र विहित नमून्यात शासनास तसेच महालेखाकार कार्यालयास सादर करावे. जिल्हाधिकारी, नाशिक यांनी सदर खर्च विहित मर्यादेत राहील याची दक्षता घ्यावी.

३. वरीलप्रमाणे अर्थसंकल्पीय वितरण प्रणालीवर उपलब्ध असलेला निधी कोषागारातून आहरित करण्यापूर्वी तसेच खर्च करतांना राज्य शासनाची कार्य नियमावली, वित्तीय नियमावली, अर्थसंकल्पीय नियम पुस्तिकेतील तरतूदी व सर्व अटी/शर्तीचे पालन करण्यात यावे.

४. यावर होणारा खर्च "मागणी क्रमांक झेडई-१ २२३५-सामाजिक सुरक्षा व कल्याण - २००- इतर कार्यक्रम-राज्य योजनांतर्गत योजना- (००)-(००)(१८) - उर्दू घरासाठी सहाय्यक अनुदाने (२२३५ ए ५५२) ३१, सहायक अनुदान (कार्यक्रम)" या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकावा व तो सन २०२४-२५ या आर्थिक वर्षात मंजूर केलेल्या तरतुदीतून भागविण्यात यावा.

५. हा शासन निर्णय, नियोजन विभाग अनौपचारिक संदर्भ क्र.४१/१४७१ दि.२८.०१.२०२५ आणि वित्त विभाग, अनौपचारिक संदर्भ क्र.३१/२०२५/व्यय-१, दि.०६.०२.२०२५ आणि शासन परिपत्रक, वित्त विभाग क्रमांक अर्थसं- २०२४/प्र.क्र.३४/ अर्थ-३, दि.०१.०४.२०२४ शासन परिपत्रक, वित्त विभाग क्रमांक अर्थसं-२०२४/प्र.क्र.८०/अर्थ-३, दि.२५.०७.२०२४ अन्वये विभागांना प्रदान करण्यात आलेले अधिकारास अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२५०२२७१४४०३८१२१४ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Digitally signed by MILIND PADMANABH SHENOY
Date: 2025.02.27 14:43:13 +05'30'

**( मिलिंद शेणॉय )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. महालेखापाल-१/२ (लेखा परिक्षा/लेखा व अनुज्ञेयता),महाराष्ट्र राज्य,मुंबई/ नागपूर,
२. सचिव, अल्पसंख्याक विकास विभाग, मंत्रालय, मुंबई यांचे स्वीय सहायक,
३. जिल्हाधिकारी, नाशिक,
४. उप सचिव (का.४),अल्पसंख्याक विकास विभाग मंत्रालय, मुंबई यांचे स्वीय सहायक,
५. उप विभागीय अधिकारी, मालेगाव विभाग, मालेगाव, जि.नाशिक,
६. कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, नाशिक,
७. जिल्हा कोषागार अधिकारी, नाशिक,
८. कक्ष अधिकारी (का-७). अल्पसंख्याक विकास विभाग, मंत्रालय, मुंबई,
९. वित्त विभाग / नियोजन विभाग / सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई,
१०. निवड नस्ती (का-४)/कार्यासन-४, संग्रहार्थ.